आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांसाठी शासकीय, निमशासकीय व सहकारी संस्थांच्या सेवेमधील राखीव जागांच्या संदर्भात प्रमाणपत्रे देण्यासंबंधी.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक: एसआरव्ही-१०८३/१९८१/के. नं. ५२/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २७-६-१९८३.

वाचा:- १] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-१०७९/६६/१६-अ, दिनांक २७ एप्रिल १९७९.

२] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-१०८०/२४७३/१६-अ, दिनांक २४-१०-१९८०.

प रि प त्र क

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-१०७९/६६/१६-अ, दिनांक २७ एप्रिल १९७९ अन्वये आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांकरिता शासकीय, निम-शासकीय व सहकारी संस्थांच्या सेवेमध्ये पदे राखीव ठेवण्याबाबतचे संकलित आदेश निर्गमित केले आहेत. या संदर्भात महसूल अधिकाऱ्यांनी द्यावयाच्या उत्पन्नाच्या प्रमाणपत्राबाबत सविस्तर आदेश सदर परिपत्रकाच्या परि. १० ते १२ मध्ये दिले आहेत. तसेच शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-१०८०/२४७३/१६-अ, दिनांक २४-१०-८० मध्ये तहसिलदारांनी सदर प्रमाणपत्रे देण्यामधील विलंब टाळण्या-साठी आदेश दिलेले आहेत. असे असूनही शासनाकडे आता अशा तक्रारी येत आहेत की, आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील उमेदवारांना प्रमाणपत्रे देण्यात जिल्हाधिकारी कार्यालयात बराच विलंब होतो. तरी सर्व जिल्हाधिकाऱ्यांना अशी विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व संबंधित तहसिलदारांना/अधिकाऱ्यांना याबाबत योग्य सूचना द्याव्या व प्रमाणपत्र देण्यासंबंधी आलेल्या अर्जांवर विनाविलंब विचार होऊन पात्र उमेदवारांना प्रमाणपत्रे सत्वर मिळतील अशी व्यवस्था करावी.

२. सर्व जिल्हाधिकाऱ्यांना अशीही विनंती करण्यात येते की, उपरिनिर्दिष्ट प्रमाणपत्र देण्याबाबत त्यांच्या नियंत्रणाखालील अधिकाऱ्यांकडे आलेल्या व दिनांक १-७-१९८३ रोजी प्रलंबित असलेल्या अर्जांची संख्या [प्रत्येक महिन्याची वेगळी] दिनांक १५-८-८३ पूर्वी न चुकता त्यांनी या विभागास कळवावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/- अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१] सर्व विभागीय आयुक्त,

२] सर्व जिल्हाधिकारी,

३] महसूल व वन विभाग, मंत्रालय [कार्यासन ब-१]